**स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेतलेल्या रुग्णांच्या खर्चाची प्रतीपुर्तींच्या प्रस्तावांची छानणी करण्याकरीता समिती गठीत करण्याबाबत..**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांक : स्वाईन २०१५/प्र.क्र.११३/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख: ३० जून,२०१५

**वाचा :**

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांक: स्वाईन २०१५/प्र.क्र.११३/आरोग्य-५ दि.२० मार्च,२०१५**
२) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे क्र.संआसे/साथरोग/स्वाईन फ्ल्यू/प्रतीपुर्ती/कक्ष-६/१२५८/१५ दि.०१ एप्रिल,२०१५.**

**प्रस्तावना**

राज्यात पसरणाऱ्या स्वाईन फ्ल्यू आजारावर प्रतिबंध व नियंत्रण करणे आवश्यक आहे. मा.मुख्यमंत्री महोदयांनी जाहीर केल्यानुसार दि.०२ मार्च, २०१५ पासून स्वाईन फ्ल्यूची साथ संपेपर्यंत स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात व्हेंटिलेटरवर किंवा तत्सम लाईफ सपोर्टवर उपचार घेणाऱ्या गरीब, आर्थिक दुर्बल घटकातील किंवा तत्सम रुग्णांना खर्चाची प्रतीपुर्ती करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आलेली आहे. तसेच खर्चाच्या प्रतीपूर्तीबाबतच्या प्रस्तावांची छाननी करण्याकरीता जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. बृन्हमुंबई महानगरपालिका क्षेत्रातील स्वाईन फ्ल्यू आजाराने बाधित रुग्णांची संख्या पाहता बृन्हमुंबई महानगरपालिका क्षेत्राकरीता स्वतंत्र समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दि.०२ मार्च, २०१५ पासून स्वाईन फ्ल्यूची साथ संपेपर्यंत स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात व्हेंटिलेटरवर किंवा तत्सम लाईफ सपोर्टवर उपचार घेणाऱ्या गरीब, आर्थिक दुर्बल घटकातील किंवा तत्सम रुग्णांना खर्चाची प्रतीपुर्ती करण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे.

सदर रुग्णांना खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्राकरीता खालील नमुद केल्याप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे. या समितीकडे अशी प्रकरणे कार्यकारी आरोग्य अधिकारी बृहन्मुंबई महानगरपालिका मुंबई यांनी निर्णयार्थ सादर करावी.

| | |
|---|---|
| १) जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा | - अध्यक्ष |
| २) कार्यकारी आरोग्य अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई | - सदस्य |
| ३) वैद्यकिय अधिक्षक, सामान्य रुग्णालय, मालाड-मालवणी | - सदस्य |
| ४) अधिष्ठाता वैद्यकिय महाविद्यालये | - सदस्य |
| ५) खाजगी रुग्णालयातील मुख्य कार्यकारी अधिकारी किंवा मुख्य प्रशासकीय अधिकारी (एक) | - सदस्य |

सदर समितीने प्रस्तावाची छाननी करण्याकरिता बैठकीचे आयोजन करुन कार्यकारी आरोग्य अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई यांचे मार्फत सादर करण्यात येणाऱ्या प्रस्तावांची छाननी करावी व खालील मार्गदर्शक सुचनानुसार प्रस्तावास मंजूरी द्यावी.

१) सदर प्रतिपूर्ती ही CGHS च्या दराप्रमाणे देय राहिल.

२) उपरोक्त समितीच्या निर्णयानुसार मंजूर प्रकरणी जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा यांनी स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेतल्यानंतर संबंधित रुग्णाने रुग्णालयाचे देयक अदा केले असल्यास सदर रक्कमेची प्रतीपूर्ती रुग्ण हयात असल्यास संबंधीत रुग्णास आणि रुग्ण मृत्यू पावलेला असल्यास रुग्णाच्या जवळच्या नातेवाईकास करावी. तसेच खाजगी

रुग्णालयातील उपचाराचे देयक रुग्णाने अदा केले नसल्यास, सदर रक्कमेची प्रतिपूर्ती संबंधित रुग्णालयास करावी.

३) स्वाईन फ्ल्यू रुग्णाने खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचाराची प्रतीपूर्ती सदर रुग्णास अन्य कोणत्याही माध्यमातून झाली असल्यास, त्यास या शासन निर्णयान्वये जाहिर केलेली प्रतीपूर्ती अनुज्ञेय नसेल.

बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई क्षेत्रातील स्वाईन फ्ल्यू या आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेणाऱ्या रुग्णांच्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याकरीता संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी आवश्यकते नुसार निधी जिल्हाधिकारी मुंबई उपनगर जिल्हा यांना त्यांचे मार्फत वितरीत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०५१४२१४२८२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.06.30 16:32:24 +05'30'

**(ज.सु.जाधव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

२. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३. सहसंचालक (हि.ह व ज.रो), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
५. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६. जिल्हाधीकारी मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई.
७. कार्यकारी आरोग्य अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका,मुंबई
८. वैद्यकिय अधिक्षक सामान्य रुग्णालय, मालाड-मालवणी.
९. अधिष्ठाता वैद्यकिय महाविद्यालये ( आरोग्य संचालनालया मार्फत)
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
११. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
१५. वित्त विभाग (अर्थसंकल्प), (व्यय-१३), (अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
१६. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१७. सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (आरोग्य-५).